**गृह विभाग--मागणी क्रमांक बी-१०, ४०७०, इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च, (००) ८००, इतर खर्च, (००) (००)(११) *महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण पोलीस विभागाच्या कार्यालयीन इमारतीचे बांधकाम करणे* (कार्यक्रम) (४०७००२११), या लेखाशीर्षाखाली, ५३-मोठी बांधकामे, या उद्दिष्टाकरिता सन २०१८-१९ या वित्तीय वर्षात मंजूर अनुदानापैकी बाकी ३० टक्के अनुदान वितरित करणे व खर्च करणे यांकरिता मंजुरी देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन निर्णय क्र. विनियो-०५१८/प्र.क्र.२०४/दोन/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक १३ फेब्रुवारी २०१९.

**वाचा** :-

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०१८/ प्र.क्र.६९/ अर्थ-३, दिनांक ०२.०४.२०१८.

२) शासन निर्णय, गृह विभाग, क्र. विनियो-०५१८/ प्र.क्र.२०४/ दोन/ पोल-७, दिनांक २८.०६.२०१८.

३) शासन शुध्दिपत्र, गृह विभाग, क्र. विनियो-०५१८/ प्र.क्र.२०४/ दोन/ पोल-७, दिनांक ०९.०८.२०१८.

४) शासन शुद्धिपत्र क्र. विनियो-०५१८/ प्र.क्र.२०४/ दोन/ पोल-७, दिनांक ०१.१०.२०१८

५) पोलीस महासंचालक, म.रा. यांच्या कार्यालयाचे पत्र क्र.पोमसं/ २७- अ/ वार्षिक-योजना-२०१८-१९/ ५९/ २०१७, दिनांक २७.११.२०१८.

६) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०१८/ प्र.क्र.६९/ अर्थ-३, दिनांक २५.०१.२०१९.

**प्रस्तावना.**

सन २०१८-१९ या वित्तीय वर्षाच्या अर्थसंकल्पात गृह विभाग--मागणी क्रमांक बी-१०, ४०७०, इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च, (००) ८००, इतर खर्च, (००)(११) महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण पोलीस विभागाच्या कार्यालयीन इमारतीचे बांधकाम करणे *(कार्यक्रम)* (४०७००२११) या लेखाशीर्षाखाली, ५३-मोठी बांधकामे, या उद्दिष्टाकरिता एकूण **रु.४० कोटी** *(रुपये चाळीस कोटी फक्त)* इतके अनुदान मंजूर करण्यात आले आहे. त्यापैकी ७० टक्के रक्कम अर्थात **रु.२८ कोटी** *(रुपये अठ्ठावीस कोटी फक्त)* वितरित व खर्च करणे यांकरिता, शासन निर्णय, गृह विभाग, क्र. विनियो-०५१८/ प्र.क्र.२०४/ दोन/ पोल-७, दिनांक २८.०६.२०१८ *(शासन शुध्दिपत्र, गृह विभाग, क्र.विनियो-०५१८/प्र.क्र.२०४/दोन/पोल-७, दिनांक ०९.०८.२०१८ व दिनांक ०१.१०.२०१८ यांसह वाचावे)* याद्वारे मंजुरी देण्यात आली आहे.

२. म.रा. पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्या. यांनी **रु.२८ कोटी** इतक्या रकमेचे उपयोजन प्रमाणपत्र सादर केले असून बाकी ३० टक्के अनुदान उपलब्ध करुन देण्याची विनंती केली आहे.

३. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०१८/ प्र.क्र.६९/ अर्थ-३, दिनांक २५.०१.२०१९, अनुसार अर्थसंकल्पीत अनुदान खर्चाची मर्यादा ही भांडवली लेख्यातील कार्यक्रमाच्या खर्चाच्या बाबींवर १०० टक्के इतकी विहित करण्यात आली आहे. त्या अनुसार बाकी ३० टक्के अनुदान वितरित व खर्च करणे यांसाठी मंजुरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय.

सन २०१८-१९ या वित्तीय वर्षाच्या अर्थसंकल्पात गृह विभाग--मागणी क्रमांक बी-१०, ४०७०, इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च, (००) ८००, इतर खर्च, (००)(११) महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण पोलीस विभागाच्या कार्यालयीन इमारतीचे बांधकाम करणे *(कार्यक्रम)* (४०७००२११) या लेखाशीर्षाखाली, ५३-मोठी बांधकामे, या उद्दिष्टाकरिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातील बाकी ३० टक्के अनुदान **रु.१२ कोटी** *(रुपये बारा कोटी फक्त)* वितरित व खर्च करणे यांकरिता, याद्वारे, मंजुरी देण्यात येत आहे.

२. उक्त रक्कम ही अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई, येथून काढून ती म.रा. पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्या., मुंबई, यांना देण्यासाठी पोलीस महासंचालक, म.रा., मुंबई, यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. व्यवस्थापकीय संचालक, म.रा. पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्या., मुंबई, यांनी उक्त रक्कम पुढीलप्रमाणे खर्च करावी:-

१) अपूर्ण असलेली कामे पूर्ण करण्यासाठी प्रशासकीय/ सुधारित प्रशासकीय मान्यता आदेशांत नमूद केलेल्या रकमांच्या मर्यादेत खर्च करण्यात यावा.
२) कामाचे नियोजन व प्रगती विचारात घेऊनच निधी उपलब्ध करून द्यावा.
३) त्यानंतर शिल्लक (असल्यास) निधी नवीन कामांना उपलब्ध करुन द्यावा.

४. "महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण पोलीस विभागाच्या कार्यालयीन इमारतीचे बांधकाम करणे" ही नवीन योजना नाही. तसेच, या योजनेचे स्वरूप व व्याप्ती यांमध्ये बदल झालेला नाही.

५. गृह विभाग--मागणी क्रमांक बी-१०, ४०७०, इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च, (००) ८००, इतर खर्च, (००)(११) महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण पोलीस विभागाच्या कार्यालयीन इमारतीचे बांधकाम करणे *(कार्यक्रम)* (४०७००२११) या लेखाशीर्षाखाली, ५३-मोठी बांधकामे, या उद्दिष्टाकरिता प्रत्येक वित्तीय वर्षात निधी उपलब्ध करुन देण्यात येत असतो. या लेखाशीर्षाखाली करण्यात आलेल्या खर्चाचे एक वर्षाहून अधिक कालावधीचे संक्षिप्त बिल (Abstract Bill) प्रलंबित नाही.

**६.** तसेच, याद्वारे असे प्रमाणित करण्यात येते की,-

१) वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग पाच, मधील अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४, अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकाराचा वापर करुन प्रशासनिक विभाग या नात्याने गृह विभागाकडून, दिनांक १०.०६.२०१८ पर्यंत रु.५ कोटी पेक्षा जास्त किंवा, यथास्थिती, दिनांक ११.०६.२०१८ पासून रु.१५ कोटी पेक्षा जास्त रकमांचे खर्चाचे अंदाज असलेल्या नवीन बांधकाम प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यापूर्वी शासनाच्या सचिव समितीची मान्यता घेण्यात आली आहे.

२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२.०४.२०१८ याच्या परिशिष्टातील अ.क्र.८ मधील तपासणी सूचीतील प्रत्येक अटीची पूर्ती झाली आहे.

**७.** हा शासन निर्णय, शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०१८/ प्र.क्र.६९/ अर्थ-३, दिनांक २५.०१.२०१९, अनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०२१८१४२९५३९४२९ असा आहे. हा शासन निर्णय डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SWAPNIL GOPAL BORSE

Digitally signed by SWAPNIL GOPAL BORSE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=c6a6e7cad855fc787a96e36f11fbc87a9f66cfd9bad01184493f2735ad885627, postalCode=400032, street=2ND FLOOR,MANTRALAYA,MADAME CAMA MARG,MUMBAI, serialNumber=8538cd1e408948f7d025537d5f6589bd8958d1b95322e66d2cc5edf89ad0d79e, ou=HOME DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SWAPNIL GOPAL BORSE
Date: 2019.02.18 14:38:03 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/ विधानपरिषद, यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
४) मा. गृह राज्यमंत्री (शहरे/ ग्रामीण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्यादित, मुंबई.

**प्रत-**

१) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
३) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.

४) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.

५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.

६) कार्यासन अधिकारी (अर्थसं-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

७) कार्यासन अधिकारी (व्यय-७/ अर्थ-३), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

८) निवड फाईल, पोल-७.